जिल्हा नियोजन समिती, गोंदिया साठी
“कार्यकारी समिती” गठित
करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डिएपी-२०२२/प्र.क्र.२/का.१४८१-अ,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२.

**पहा:-** १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम ,१९९८
२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २०००
३) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८
४) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती गोंदिया यांचे पत्र क्र.जिनिस/का - १/ जिवायो २०२१-२२/४०, दि.११/१/२०२२.

**शासन निर्णय :-**

“ महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८ च्या कलम ११ च्या तरतूदी अनुसार जिल्हा नियोजन समितीला सहाय्य करण्यासाठी, जिल्हा नियोजन समितीच्या अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली एक “कार्यकारी समिती” गठित करण्याबाबतची तरतूद महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८ च्या “नियम ६-अ” मधे करण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद कार्यकारी समितीमधे उक्त अधिनियमाच्या कलम ३ (३) च्या परिच्छेद दोन अन्वये एकूण “नामनिर्देशित सदस्य” यांचेपैकी २ “नामनिर्देशित सदस्य” आणि कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (अ) व (फ) नुसार एकूण “ विशेष निमंत्रित “ सदस्य यांचेपैकी २ “विशेष निमंत्रित” सदस्यांची नियुक्ती होणे आवश्यक आहे.

२. “महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम, २०१८” मधील “नियम ६-अ” च्या तरतुदीनुसार व महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम,१९९८ च्या कलम ३ (३) च्या परिच्छेद दोन अन्वये एकूण “नामनिर्देशित सदस्य” आणि कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (फ) नुसार एकूण “विशेष निमंत्रित” सदस्य यांचेपैकी, जिल्हा नियोजन समिती, **गोंदिया** चे अध्यक्ष तथा पालकमंत्री यांनी शिफारस केल्यानुसार **गोंदिया** ची “कार्यकारी समिती” पुढीलप्रमाणे गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नांव | पदनाम |
|---|---|---|
| १. | मा.पालकमंत्री, गोंदिया | अध्यक्ष |
| २. | श्री.मनोहर गोवर्धन चंद्रिकापुरे, विधानसभा सदस्य | नामनिर्देशित सदस्य |
| ३. | श्री.सहसराम मारोती कोरोटे, विधानसभा सदस्य | नामनिर्देशित सदस्य |
| ४. | श्री.राजेंद्र हिरालाल जैन | विशेष निमंत्रित सदस्य |
| ५. | विभागीय आयुक्त,नागपूर | सदस्य |
| ६. | जिल्हाधिकारी, गोंदिया | सदस्य |
| ७. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया | सदस्य |
| ८. | जिल्हा नियोजन अधिकारी, गोंदिया | संयोजक |

३. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, **गोंदिया** यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२०२१५५७२२१०१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANJEEV HARISHCHANDRA DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36,
pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D,
serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2022.02.02 15:58:00 +05'30'

**(सं. ह. धुरी)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. पालकमंत्री तथा अध्यक्ष, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया यांचे खाजगी सचिव.
५. मा. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, महाराष्ट्र, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग नागपूर
९. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया
१०. उपआयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर.
११. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, गोंदिया.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया.
१४. निवडनस्ती,का-१४८१ अ.